**१७ व्या पुणे आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवाच्या आयोजनासाठी आणि पुरस्कारांसाठी सहाय्यक अनुदान मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आंचिम-२०१८/प्र.क्र.१०५/सां.का.१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ११ डिसेंबर, २०१८.

वाचा : १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.आंचिम-२०११/प्र.क्र.१५८/सां.का.१, दि.१८.१०.२०१२.
२) संचालक सांस्कृतिक कार्य संचालनालय यांचे पत्र क्र. सां.का.सं./६३४४, दि.१७.११.२०१८.

**शासन निर्णय** :

महाराष्ट्र शासन व पुणे फिल्म फाऊंडेशन यांच्या संयुक्त विद्यमाने दरवर्षी पुणे आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव आयोजित करण्यात येतो. दि.१० ते १९ जानेवारी, २०१९ या कालावधीत १७ वा पुणे आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव आयोजित करण्यात येणार असल्याने या महोत्सवाच्या आयोजनासाठी रु.५०.०० लाख आणि या महोत्सवातील महाराष्ट्र प्रभात सर्वोत्कृष्ट आंतरराष्ट्रीय चित्रपटास रु.१०.०० लाख, महाराष्ट्र प्रभात सर्वोत्कृष्ट आंतरराष्ट्रीय चित्रपट दिग्दर्शकास रु.५.०० लाख आणि महाराष्ट्र संत तुकाराम सर्वोत्कृष्ट मराठी चित्रपटास रु.५.०० लाख असे पुरस्कार वितरणासाठी एकूण रु.७०.०० लाख एवढे सहाय्यक अनुदान मंजूर करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. तथापि वित्त विभागाच्या ७० टक्के मर्यादेत खर्च करण्याच्या धोरणानुसार १७ व्या पुणे आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवाच्या आयोजन व पुरस्कार वितरणासाठी एकूण **रु.४९.००लाख (रुपये एकोणपन्नास लाख फक्त)** इतके सहाय्यक अनुदान खालील अटींच्या अधिन राहून शासन मंजूर करीत आहे.

**अटी** :-

१. सदर महोत्सवासाठी करण्यात येणाऱ्या जाहिरातीमध्ये महाराष्ट्र शासनाच्या सांस्कृतिक कार्य विभागाची जास्तीत जास्त प्रसिध्दी करणे आवश्यक राहील. (फलक / बॅनर लावणे, जाहिरातीमध्ये महाराष्ट्र शासनाचा लोगो प्रसिध्द करणे इ.)
२. महोत्सवासाठी स्थानिक लोकप्रतिनिधींना निमंत्रित करणे आवश्यक राहील.
३. सदर महोत्सवाच्या परीक्षक मंडळामध्ये शासनाच्या प्रतिनिधींचा समावेश करणे आवश्यक राहील.
४. मंजुर केलेले अनुदान हे अनावर्ती असेल व शासनाच्या नेहमीच्या अनुदानासंदर्भातील अटी व शर्ती यांच्या अधिन राहून असेल.
५. या अनुदानासंदर्भातील उपयोगिता प्रमाणपत्र एक महिन्याचे आत सादर करणे बंधनकारक राहील.

६. अनुदानाचा विनियोग केवळ मंजूर केलेल्या प्रयोजनार्थ व तात्काळ करण्यात यावा. तसे न केल्यास अनुदानाची रक्कम प्रचलित बँक व्याज दराने शासनास परत करणे बंधनकारक राहील.

७. सदर महोत्सवाचा खर्च सनदी लेखापालाकडून प्रमाणित करुन जमा-खर्चाचा तपशिल शासनास सादर करण्यात यावा.

८. वरील सर्व निकष / अटी यातील बदल, सुधारणा किंवा अर्थ लावणे याबाबतचे पूर्ण अधिकार शासनास राहतील व याबाबत शासनाने दिलेले आदेश अंतिम व संबंधितांवर बंधनकारक राहतील. तसेच याबाबत करारावर स्वाक्षरी करणाऱ्या दोन्ही पक्षात वाद झाल्यास वादाचे निराकरण करण्याकरीता प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचा लवाद नेमण्यात येऊन त्यांनी दिलेला निर्णय अंतिम तसेच दोन्ही पक्षांवर बंधनकारक राहील. तथापि, लवाद नेमल्यास कोणत्याही पक्षास न्यायालयात जाण्याची मुभा नाही. वरील अटी शर्तींसह करार करण्यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

९. सदर अनुदान वितरीत करण्यापूर्वी १६ व्या पुणे आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवाकरीता दिलेल्या अनुदानाबाबत उपरोक्त ६ ते ७ येथील पूर्ततांबाबत संचालक, सांस्कृतिक कार्य यांनी प्रथम खात्री करुन घ्यावी व तद्नंतर १७ व्या पुणे आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवासाठी अनुदान वितरीत करावे.

१०. आयोजक संस्थेला शासन निर्णय दि.१८.१०.२०१२ अन्वये घोषित धोरणातील सर्व अटी व शर्तींची पूर्तता करणे बंधनकारक राहील.

**२.** संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांना संबंधीची देयके आहरित करुन संवितरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**३.** यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती (००) १०२, कला संस्कृती प्रचालन (०३) (०६) आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव (२२०५ १५८१), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

**४.** ही मान्यता, शासन निर्णय क्र.विअप्र-२१३/विनियम, दि.१७ एप्रिल २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग ३, अ.क्र.४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार व शासन निर्णय क्र.आंचिम २०११/प्र.क्र.१५८/सां.का.१, दि.१८ ऑक्टोबर, २०१२ अन्वये प्राप्त खर्च करण्याच्या अधिकारानुसार देण्यात येत आहे. प्रस्तावित खर्चासंदर्भात वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८ मधील परिच्छेद क्र.६ (अ)(ब)(क), ७(१अ)(३) तसेच परिशिष्टातील अ.क्र.८ मधील अट क्र.१,२,३,४,५,१० ची पूर्तता होत असून उर्वरीत सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटी या प्रकरणी लागू होत नाहीत.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८१२१०१७३०५७२३२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Vilas Ramrao Thorat
Date: 2018.12.12 15:30:40 +05'30'

**( विलास रा. थोरात )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२) मा.मुख्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई.
४) सर्व सन्माननीय विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५) मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे विशेष कार्य अधिकारी.
६) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता )-एक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) महालेखापाल ( लेखापरीक्षा )-एक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
१२) संचालक, पुणे फिल्म फाऊंडेशन, फ्लॅट नं.१, सारजाई बिल्डिंग, साईबाबा मंदिराजवळ, मुकुंद नगर, पुणे-सातारा रोड, पुणे - ४११ ०३७.
१३) अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई. (यांना उक्त अनुदानाची रक्कम अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीव्दारे उपलब्ध करुन देण्यासंदर्भातील कार्यवाहीसाठी अग्रेषित )
१४) निवड नस्ती सां.का.१.